अतितात्काळ/अर्थसंकल्प प्राथम्य

महाराष्ट्र (द्वितीय पुरवणी) विनियोजन अधिनियम,२०१५, निधी वितरण.......

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक : पूरक-२०१५/प्र.क्र. १४०/अर्थसंकल्प-३.**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- ०६ ऑक्टोबर, २०१५

**संदर्भ:-** १) शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३,दि.१७.४.२०१५

२) शासन परिपत्रक क्र. अर्थस २०१५/प्र.क्र.१११/अर्थ-३,दि. ३०.६.२०१५

३) शासन परिपत्रक क्र. पूरक २०१५/प्र.क्र.१४०/अर्थ-३,दि. १.८.२०१५.

४) शासन परिपत्रक क्र. पूरक-२०१५/प्र.क्र.१४०/अर्थ-३,दि.११.९.२०१५

**परिपत्रक**

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक पूरक-२०१५/प्र.क्र.१४०/अर्थसंकल्प-३ दिनांक १.८.२०१५ च्या परिपत्रकान्वये महाराष्ट्र (द्वितीय पुरवणी) विनियोजन अधिनियमानुसार मंजूर झालेल्या पुरक मागण्यांच्या रकमा वाटप करण्यापूर्वी योजनांतर्गत मागणीसंदर्भात नियोजन व वित्त विभागाची आणि योजनाबाह्य साठी वित्त विभागाची मान्यता घ्यावी, असे कळविण्यात आलेले आहे.

२. तसेच, संदर्भाधीन क्रमांक पूरक-२०१५/प्र.क्र.१४०/अर्थसंकल्प-३ दिनांक ११.९.२०१५ च्या परिपत्रकान्वये सन २०१५-१६ च्या अर्थसंकल्पात जनतेच्या व्यापक हितासाठी शासनाने नाविण्यपूर्ण योजना घोषीत केल्या असून त्याकरीता पुरेसा नियतव्यय उपलब्ध असून मंत्रीमंडळाची मान्यता घेण्यात आलेली आहे व त्याबाबतचे शासन निर्णय वित्त व नियोजन विभागाच्या मान्यतेने निर्गमित करण्यात आलेले आहेत, अशा योजनांना वरील पुरवणी विनियोजन अधिनियमानुसार निधी मंजूर (अर्थसंकल्पीत) केला असल्याने, फक्त अशा योजनांसाठी संबंधित प्रशासकीय विभागानी आता त्यांच्या स्तरावर निधीचे वितरण करावे याबाबतच्या निधी वितरणाच्या नस्त्या यापुढे नियोजन/वित्त विभागाला पाठवू नयेत, असेही कळविण्यात आलेले आहे.

३. आता सदर पुरवणी विनियोजन अधिनियमानुसार ज्या पुरक मागण्या वित्त / नियोजन विभागाने काही अटी व शर्तीवर मंजूर केल्या असतील त्या वगळून इतर पुरक मागण्यांचे ७०% निधीचे वितरण संबंधित प्रशासकीय विभागांनी त्यांच्या स्तरावर करावे असे कळविण्यात येत आहे. त्यामुळे विभागाने आता ज्या पुरवणी मागणी वित्त / नियोजनने काही अटी व शर्तीचे अधीन मंजूर केल्या असतील तेवढ्याच पूरवणी मागण्याचे निधी वितरणाचे प्रस्ताव वित्त / नियोजन विभागाला पाठवावेत; अन्य नस्त्या यापुढे नियोजन / वित्त विभागाला पाठवू नयेत. सदर निधी वितरीत करण्यापूर्वी प्रशासकीय विभागांनी नियोजन व वित्त विभागाने यापूर्वी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित निकष,

वित्तिय अधिकारांचे प्रत्यायोजन तसेच वित्त विभागाच्या दि. १७.४.२०१५ च्या परिपत्रकातील सूचनांचे तंतोतंत पालन करणे आवश्यक आहे.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१००६१२३७१२२२०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Narayan Bhosale

Digitally signed by Ashok Narayan Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=d40850c6db60734c4acd1f5455264095b6839b2fd94fa7c0ad1b12bcab7f8fbb, cn=Ashok Narayan Bhosale
Date: 2015.10.06 12:37:59 +05'30'

**(अ. ना. भोसले)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,मुंबई.

२) सह/उपसचिव (अर्थसंकल्प शाखा),सर्व मंत्रालयीन विभाग,मुंबई.

३) महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)(व्हीएलसी शाखा), महाराष्ट्र,मुंबई /नागपूर,

५) महालेखापाल (लेखापरीक्षा),महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

६) अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई

७) सर्व जिल्हाधिकारी (कोषागारे)

८) निवासी लेखापरीक्षा अधिकारी,मुंबई,

९) सर्व सह/उपसचिव वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.

१०) कार्यासन अधिकारी,प्रशासन-४, वित्त आयोग,वित्त विभाग,

११) निवड नस्ती, अर्थसंकल्प-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.